विदेशी कलाकारांचा सहभाग असलेल्या
कार्यक्रमांना ना-हरकत प्रमाणपत्र देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग, नविन प्रशासकीय इमारत,**
**शासन परिपत्रक क्र.- संकीर्ण-०८१८/प्र.क्र.-३००/विदेशी-१**
९ वा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ३२.
दिनांक- २३ ऑगस्ट, २०१८.

## शासन परिपत्रक

**संदर्भ-** गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे परिपत्रक क्र. २५०२२/१८/५-FI, दि. ५/४/२००५.

राज्यात आयोजित करण्यात येणाऱ्या कार्यक्रमामध्ये विदेशी कलाकारांचा सहभाग असल्यास भारत सरकारच्या सुचनेनुसार ना-हरकत प्रमाणपत्र गृह विभागामार्फत देण्यात येते. अशा कार्यक्रमांना ना-हरकत प्रमाणपत्र देण्यासाठी संबंधित आयोजकांनी कार्यक्रमाच्या नियोजित दिनांकापूर्वी किती दिवस अगोदर शासनास प्रस्ताव सादर करावा, विदेशी नोंदणी अधिकाऱ्यांनी शासनास किती दिवसात अहवाल सादर करावा याबाबत केंद्र अथवा राज्य शासनाकडून कोणत्याही मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या नाहीत. साहजिकच ऐनवेळी प्रस्ताव प्राप्त झाल्यावर संबंधित विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी यांच्याकडून अहवाल मागविणे आणि असा अहवाल प्राप्त झाल्यावर सदर अहवालाची छाननी करुन त्यास शासनाची मान्यता देणे व कार्यक्रमाच्या नियोजित दिनांक व वेळे आधी संबंधित आयोजक संस्थेस ना-हरकत प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणे, प्रमाणपत्राची प्रत संबंधित स्थानिक पोलीस स्टेशनला देणे या बाबींची पूर्तता करण्यास पुरेसा कालावधी मिळत नाही. यावर उपाययोजना करण्यासाठी शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन परिपत्रक

राज्यात आयोजित करण्यात येत असलेल्या विदेशी कलाकारांचा सहभाग असलेल्या कार्यक्रमांकरिता संबंधित आयोजक संस्थेने किमान ८ कार्यालयीन दिवस अगोदर सर्व आवश्यक कागदपत्रांसह शासनाकडे विहीत प्रपत्रात अर्ज सादर करणे आवश्यक आहे.

२. गृह विभागाकडून संबंधित विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी यांच्याकडे कार्यक्रमातील विदेशी कलाकारांच्या सहभागाबाबत अहवाल मागविण्यात आल्यानंतर त्यांनी कार्यक्रमाच्या दिनांकापूर्वी किमान दोन कार्यालयीन दिवस अगोदर शासनास अहवाल सादर करावा.

जेणेकरुन आयोजक संस्थांना ना-हरकत प्रमाणपत्र उपलब्ध करुन देण्यासाठी प्रस्तावाची छाननी करुन मान्यता देण्याची कार्यवाही पूर्ण करण्यास विभागास पुरेसा अवधी मिळेल.

३. सदर प्रकरणी वर नमूद केलेल्या कालमर्यादांचे सर्व संबंधितांनी काटेकोर पालन करावे.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०८२३१५२४५८८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amar Chandrakant Zaware

Digitally signed by Amar Chandrakant Zaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d3427f3930c96a4cf61d24037072304e1a84a67a288fb5e841e95fc711f58a5e, cn=Amar Chandrakant Zaware
Date: 2018.08.30 16:30:23 +05'30'

**( अमर चं. झावरे )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, मुंबई.
३. सर्व आयोजक संस्था.
४. सर्व विदेशी नागरिक नोंदणी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
५. वरीष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. वरीष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (अ.व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. स्वीय सहायक, प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (विदेशी-१ कार्यासन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.